**मध्यवर्ती कारागृह आणि भायखळा व कल्याण येथील महिला कारागृहे येथे महिला परिविक्षा अधिकारी यांची नियुक्ती करण्यासाठी ९ महिला परिविक्षा अधिकाऱ्यांच्या पदांच्या निर्मितीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन पूरकपत्र क्र. अपअ-२०२२/प्र.क्र.४३/का-९**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक-१ मार्च, २०२४

**वाचा-** १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १३/१०/२०२३

२) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. बाविआ/आस्था/का-१/ प्र.१३/म.प.अ./२०२३/४०७, दि. २५.१.२०२४

**शासन पूरकपत्र:-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये "सराईत अपराधी व अपराधी परिविक्षा योजना" या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्यातील मध्यवर्ती कारागृहे तसेच महिला कारागृहांमध्ये ९ महिला परिविक्षा अधिकाऱ्यांची पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ नंतर पुढीलप्रमाणे परिच्छेद क्र. २ (अ) समाविष्ट करण्यात येत आहे.

२ (अ) या ९ महिला परिविक्षा अधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते भागविणे व सेवाशर्ती पुढीलप्रमाणे राहील:-

२.१) यापूर्वी महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. मबाआ-२००२/ प्र.क्र.९५/का-७, दि. ५.४.२००३ अन्वये महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांसाठी निर्माण केलेल्या परिविक्षा अधिकाऱ्यांच्या पदांव्यतिरिक्त जिल्हा महिला व बाल विकास कार्यालय, मुंबई शहर, ठाणे, नाशिक, पुणे, कोल्हापूर, छत्रपती संभाजीनगर, अकोला, अमरावती व नागपूर या कार्यालयाच्या आस्थापनेवर प्रत्येकी १ याप्रमाणे एकूण ९ महिला परिविक्षा अधिकाऱ्यांची पदे निर्माण करण्यात येत आहेत.

२.२) या पदांनाही परिविक्षा अधिकाऱ्यांसाठी यापूर्वी निश्चित केलेले सेवाप्रवेश नियम व अन्य अटी/शर्ती लागू राहतील.

२.३) या ९ परिविक्षा अधिकाऱ्यांचे वेतन व भत्ते यावरील खर्च मागणी क्र. X-१, ०२, समाज कल्याण, ००१, संचालन व प्रशासन (०१) महिला व बाल कल्याण संचालनालय, (०१) (०१) महिला व बाल कल्याण संचालनालय (अनिवार्य) (२२३५२०७२) या लेखशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

२.४) या महिला परिविक्षा अधिकाऱ्यांची जागा बदलीने अथवा कोणत्याही कारणाने रिक्त झाल्यास त्या जागेवर अन्य महिला परिविक्षा अधिकाऱ्यांचीच नियुक्ती करण्यात यावी. तसेच या शासन निर्णयासोबत जोडलेल्या कारागृहांच्या यादीमधील अ.क्र. ९ येथे अकोला जिल्हा कारागृह (महिला विभाग) व अकोला महिला खुले कारागृह असे वाचावे.

२. सदर शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३०४११४६२५८८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD VINAYAKRAO KULKARNI

Digitally signed by PRASAD VINAYAKRAO KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=83b8be9eb843dd6eccbd6aa4f9eecd0b5f7aca67ff32b2eef7b9ed2d85ab9442, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D19730DDF785210D50C28934B75E9B7B4F5D06B6181CF1901CE3E48EC9E3985, cn=PRASAD VINAYAKRAO KULKARNI
Date: 2024.03.04 11:55:34 +05'30'

**(प्र.वि.कुलकर्णी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मा. प्रधान सचिव (विधी व परामर्शी) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मा. प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.परिविक्षा अधिक्षक, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.निवड नस्ती (का-९)